**राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत बुलढाणा नगरपरिषदेतील संगम तलावाच्या संवर्धनाच्या कामांसाठी निधी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०२३/प्र.क्र.०९/आस्थापना (अ)**
नवीन प्रशासन भवन, १५ वा मजला, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २० फेब्रुवारी, २०२३.

**वाचा :-**

१)पर्यावरण विभागाचा शासन निर्णय क्रमांक रासयो-२०१३/प्र.क्र.११०/तां.क.३, दिनांक ०६.०१.२०१५

२)पर्यावरण विभागाचा शासन निर्णय क्रमांक रासयो-२०१३/प्र.क्र.११०/तां.क.३, दिनांक २६.०३.२०१८

३)मुख्याधिकारी, बुलढाणा नगरपरिषद, जि. बुलढाणा यांचे दि.१९.०७.२०२२ व दि.०१.११.२०२२ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना -**

राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत मुख्याधिकारी, बुलढाणा नगरपरिषद यांचेमार्फत प्राप्त बुलढाणा तलावाच्या संवर्धन प्रस्तावास कामे राबविण्यासाठी संदर्भाधीन दि ०६ जानेवारी, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये पहिल्या टप्यामध्ये रु.२५,००,०००/- इतका निधी Mobilization Fund म्हणून बुलढाणा नगरपरिषदेस वितरित करण्यात आला होता. सदर निधी पूर्णपणे खर्च केल्यानंतर संदर्भाधीन दि. २६ मार्च, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये बुलढाणा नगरपरिषद हद्दीतील संगम तलाव संवर्धनाच्या प्रस्तावास रक्कम रुपये ३,०२,३८,२३२/- (रु. तीन कोटी दोन लक्ष अडतीस हजार दोनशे बत्तीस फक्त) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून राज्य हिस्स्यापोटी देय रक्कम रुपये २,४०,००,०००/- (रु. दोन कोटी चाळीस लक्ष फक्त) इतकी आहे. तसेच बुलढाणा नगरपरिषदेचा हिस्सा रुपये ६२,३८,२३२/- (बासष्ट लक्ष अडतीस हजार दोनशे बत्तीस फक्त) इतका आहे. सदर मान्यतेनुसार संगम तलाव संवर्धनासाठी मुख्याधिकारी, बुलढाणा नगर परिषद यांना रुपये ५०,००,०००/- इतका निधी वितरित करण्यात आला होता. सदर निधी पूर्णपणे खर्च झाल्याबाबत १९.०७ २०२२ रोजीच्या पत्रासोबत जोडलेल्या उपयोगिता प्रमाणपत्रात नमूद केले आहे.

मुख्याधिकारी यांच्या दि.०१.११.२०२२ रोजीच्या पत्रासोबत दिलेल्या भौतिक प्रगती अहवालानुसार तलाव संवर्धनाचे ४०% काम पूर्ण झाल्याबाबत कळविले आहे. प्रशासकीय मान्यतेच्या शासन निर्णयानुसार तलाव संवर्धनासाठी बुलढाणा नगरपरिषदेचा २०% हिस्सा (रुपये १५ लक्ष) इतक्या निधीचा भरणा केल्याबाबत बुलढाणा नगरपरिषदेने प्रमाणित केले आहे. सदर प्रस्तावास महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती यांच्या दि.०२.०३.२०२० व महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बुलढाणा यांच्या

दि.०१.११.२०२१ रोजीच्या पत्रान्वये रु. ३,००,१५,१४९/- इतक्या किमतीच्या प्रस्तावास तांत्रिक मान्यता दिल्याबाबत मुख्याधिकारी यांच्या दि.०१.११.२०२२ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे.

आतापर्यंत संगम तलाव संवर्धनासाठी राज्य हिस्स्यापोटी देय असलेल्या रु. २,४०,००,०००/- इतक्या रकमेपैकी ७५ लक्ष इतका निधी वितरित करण्यात आलेला आहे. उपरोक्त कागदपत्राच्या आधारे तसेच एकूण खर्चाच्या अनुषंगाने बुलढाणा नगरपरिषदेतील संगम तलावाच्या पर्यावरण संवर्धनासाठी उर्वरित रूपये रु.१६५.०० लक्ष इतक्या निधीपैकी रुपये १५०.०० लक्ष इतका निधी मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राज्य सरोवर संवर्धन योजनेतंर्गत संगम तलावाच्या पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन करण्यासाठी संदर्भाधीन दि. २६ मार्च, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये एकूण मंजूर रूपये ३,०२,३८,२३२/- (रु. तीन कोटी दोन लक्ष अडतीस हजार दोनशे बत्तीस फक्त) एवढया निधीमधील राज्य हिस्स्यापोटी एकूण मंजूर रुपये २,४०,००,०००/- (रु. दोन कोटी चाळीस लक्ष फक्त) इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. मंजूर रकमेपैकी आतापर्यंत रुपये ७५,००,०००/- इतका निधी वितरित करण्यात आला असून आता या शासन निर्णयान्वये मुख्याधिकारी, बुलढाणा नगरपरिषद यांना संगम तलावाच्या संवर्धनासाठी उर्वरित कामे राबविण्यासाठी पुढील हप्ता रुपये १,५०,००,०००/- (रु. एक कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी वितरित करण्यास तसेच सदर रक्कम खर्च करण्यास मुख्याधिकारी, बुलढाणा नगरपरिषद यांना या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. मुख्याधिकारी, बुलढाणा नगरपरिषद, जि. बुलढाणा (Chief Officer, Buldana Municipal Council) यांनी सदर निधी मंजूर कामांसाठी खर्ची करून अंतीम उपयोगिता प्रमाणपत्र व प्रकल्प पूर्णत्वाचा अहवाल पर्यावरण व वातावरणीय बदल विभागास सादर करण्याची दक्षता घ्यावी. तलाव संवर्धनाचे काम पूर्ण झाल्याबाबत कार्यपूर्ती अहवाल विभागास प्राप्त झाल्यावर उर्वरित रुपये १५ लक्ष इतका निधी वितरित करण्यात येईल.

३. मुख्याधिकारी, बुलढाणा नगरपरिषद, जि. बुलढाणा यांना अदा करावयाची रूपये १,५०,००,०००/- (रु. एक कोटी पन्नास लक्ष फक्त) एवढी रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून वित्त विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२०/प्र.क्र.६/२०/कोषा-प्रशा ५,दि १२.११.२०२१ अन्वये ई-कुबेर प्रणालीद्वारे थेट मुख्याधिकारी, बुलढाणा नगरपरिषद, जि. बुलढाणा यांच्या बँक खात्यात जमा करावे.

४. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र. यू-४, ३४३५ परिस्थितिकी व पर्यावरण ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -राज्य योजनांतर्गत योजना, (०२),पर्यावरण प्रतिबंध, (०२) (०७), राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)” या मुख्य- लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा.

५. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, दिनांक ०४.०४.२०२२ रोजीच्या शासन निर्णयातील परिशिष्टातील अनु.क्र. २ व ९ मधील अटींची पुर्तता होत आहे, तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार वितरित करण्यात येत आहे.

I) वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील ३१ वेतनेतर सहायक अनुदाने या बाबीखालील खर्च करण्यास विभागाला अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील नमूद अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

II) वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक १,३,४,५,६,७ व ८ या प्रकरणी लागू नाही. तसेच सदर परिशिष्टातील अनुक्रमांक ४ बाबत नमूद करण्यात येते की ही योजना केंद्र पुरस्कृत बाहय सहाय्यित योजना नाही.

III) वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ च्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक २ च्या अनुषंगाने नमूद करण्यात येत की, सदर योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये कसलाही बदल करण्यात आलेला नाही. तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक १,२,३ व ४ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटींची पूर्तता होत आहे. तसेच सदर अनुक्रमांक ९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक ५ ते १० या प्रकरणी लागू नाही.

६. या शिवाय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दिनांक १०.०५.२०१६ अन्वये परिच्छेद क्र.४ मधील खालील बाबींची पूर्तता होत आहे.

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकाराबाबत वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दिनांक ०२.०४.२०१८ मधील परिच्छेद क्र.६ (अ) नुसार रु.५ कोटी पर्यंतच्या अनावर्ती योजनेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना आहेत.

२) संगम तलावाच्या संवर्धनासाठी रुपये ३,०२,३८,२३२/- (रु. तीन कोटी दोन लक्ष अडतीस हजार दोनशे बत्तीस फक्त) एवढया मंजूर निधीमधील राज्य हिस्स्यापोटी एकूण मंजूर रु. २,४०,००,०००/- (रु. दोन कोटी चाळीस लक्ष फक्त) पैकी रूपये १,५०,००,०००/- (रु. एक कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी पुढील हप्त्यापोटी प्रस्तूत शासन निर्णयाव्दारे वितरित करण्यात येत आहे.

३) सदर तलावास मागील तीन महिन्यात कोणताही निधी मंजूर करण्यात आलेला नाही. मुख्याधिकारी, बुलढाणा नगरपरिषद, जि. बुलढाणा यांना वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाचा १०० टक्के विनियोग पूर्ण केला असल्याबाबत उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे.

४) "मागणी क्र.यु-४, ३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण, ०४, प्रदुषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०२) पर्यावरण प्रतिबंध (०२) (०७) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)"या मुख्य लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) मुख्याधिकारी, बुलढाणा नगरपरिषद, जि. बुलढाणा यांच्याकडून पर्यावरण व वातावरणीय बदल विभागास कोणतेही येणे बाकी नाही.

६) तसेच उपरोक्त शासन निर्णयाच्या "अ" मधील परिच्छेदातील ६,७,८,९ या बाबी लागू नाहीत.

७. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०२२०१६२९२९२४०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANOHAR RAMCHANDRA BANDPATTE

Digitally signed by MANOHAR RAMCHANDRA BANDPATTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eb60e1f4b73938805c04b06f5c0907864cb639223a53ce540f9ce8e8e6593e5d, pseudonym=FE5A321DEA974CAA3C7940B0A97FDD86898BAB28, serialNumber=BB7B9A28CD6D8E2B1FA8F60D210258464E6ECE204D02617FBB7ED6BE3DB6752C, cn=MANOHAR RAMCHANDRA BANDPATTE
Date: 2023.02.20 16:33:31 +05'30'

**( म. रा. बंदपट्टे ),**
**अवर सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री (पर्यावरण व वातावरणीय बदल ) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल), मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल, मंत्रालय, मुंबई.
८. मुख्याधिकारी, बुलढाणा नगरपरिषद,जि. बुलढाणा.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा) १. महाराष्ट्र मुंबई-४०००२०
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई- ४०००२०

११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा) २. महाराष्ट्र, नागपूर
१३. अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई-४०००५१.
१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१५. निवासी लेखाधिकारी, मुंबई
१६. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
१७. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधीलेखा, कोकण भवन, मुंबई
१८. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१९. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
२०. रोखशाखा, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. निवडनस्ती.